विधि व न्याय विभाग, कार्यासन ८ च्या अधिपत्याखालील १३ सरकारी वकील कार्यालयातील अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतनसंरचनेत सुधारणा करण्यासंदर्भात उपसमितीने केलेल्या शिफारशींचा अभ्यास करण्याकरिता समिती गठित करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णयः संकीर्ण-२८२४/प्र.क्र.२१/का.८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबईः ४०० ०३२
दिनांक: १४ मे, २०२५

वाचा:-१) मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथील रिट पिटीशन क्र.२३८०/२०२० मध्ये मा. उच्च न्यायालयाने दि.०९.०२.२०२४ व दि.०५.०३.२०२४ रोजी दिलेले आदेश.
२) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२८२४/प्र.क्र.२१/का.८, दि.०३ एप्रिल, २०२४.
३) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२८२४/प्र.क्र.२१/का.८, दि.३० एप्रिल, २०२४.
४) मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथील रिट पिटीशन क्र. २३८०/२०२० मध्ये मा. उच्च न्यायालयाने दि.२४.०७.२०२४ रोजी दिलेले आदेश.
५) सदस्य सचिव, स्टाफिंग पॅटर्न समिती, सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे पत्र जा.क्र/आ.शा./३१९५/WA/२०२४, दि. १५ ऑक्टोबर, २०२४.
६) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२८२४/प्र.क्र.२१/का.८, दि.२१ फेब्रुवारी, २०२५.
७) मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथील रिट पिटीशन क्र. २३८०/२०२० मध्ये मा. उच्च न्यायालयाने दि. २१.०४.२०२५ रोजी दिलेले आदेश.
८) सदस्य सचिव, वेतन सुधारणा उपसमिती, सरकारी अभियोक्ता, बृहन्मुंबई, मुंबई यांचे पत्र जा.क्र.२५८/२५, दि.३० एप्रिल, २०२५.
९) मा. महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. एजी/३३१/२०२५, दि.०६ मे, २०२५.

प्रस्तावना:-

मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथे दाखल रिट पिटिशन क्र. २३८०/२०२० मध्ये मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर यांनी दि.०९.०२.२०२४ व दि.०५.०३.२०२४ रोजी सरकारी वकील कार्यालयात पुरेसे कर्मचारी उपलब्ध करुन देण्याबाबत व आवश्यकता असल्यास राज्यातील सर्व सरकारी वकील कार्यालयातील स्टाफिंग पॅटर्नची पुनर्रचना करण्याच्या अनुषंगाने आवश्यक कार्यवाही करण्याचे निदेश दिलेले होते. उक्त निदेशाच्या अनुषंगाने विधि व न्याय विभागातील कार्यासन ८ च्या प्रशासकीय नियंत्रणाखालील १३ सरकारी वकील कार्यालयातील स्टाफिंग पॅटर्नची पुनर्रचना करण्याकरिता संदर्भ क्र. २ येथील दि.०३.०४.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये समिती गठित करण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्र. २(ब) अन्वये १३ सरकारी वकील कार्यालयातील अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतनसंरचनेत सुधारणा करण्यासंदर्भात शिफारशी करण्याबाबत निर्देश देण्यात आलेले होते. त्यानुषंगाने, शासन निर्णय दि.३०.०४.२०२४ व दि.२१.०२.२०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये उपसमिती गठित करण्यात आलेली आहे. सदर दोन्ही उपसमितीने संदर्भ क्र. ५ व ८ येथील पत्रान्वये मा. महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अध्यक्षतेखालील समितीस अहवाल सादर केलेला आहे.

२. मा. महाअधिवक्ता यांनी संदर्भ क्र. ८ येथील दि. ०६.०५.२०२५ रोजीच्या पत्रान्वये, वेतनसंरचनेत सुधारणा करणे हा मुद्दा प्रामुख्याने सरकारी वकीलांच्या कार्यालयातील अधिकारी / कर्मचारी यांनी केलेल्या विनंतीशी संबंधित असल्याने,

या संदर्भात विधि व न्याय विभागाने सर्व सरकारी वकीलांची सल्लामसलत करुन शासनाला शिफारसी केल्यास ते योग्य होईल. त्यामुळे, शासन निर्णय दि.०३.०४.२०२४ अन्वये गठित करण्यात आलेल्या समितीचे पुनर्गठन करून उपसमितीच्या शिफारशींचा अभ्यास तसेच वेतनसंरचनेत सुधारणा करण्याबाबत समिती पुनर्गठित करण्याबाबत विनंती केलेली आहे. त्यानुषंगाने १३ सरकारी वकील कार्यालयातील अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतनसंरचनेत सुधारणा करण्याबाबत प्राप्त झालेल्या शिफारशींचा अभ्यास करुन शासनास अहवाल सादर करण्याकरिता समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय</u>:-

विधि व न्याय विभाग, कार्यासन ८ च्या अधिनस्त सरकारी वकील कार्यालयातील अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतनसंरचनेत सुधारणा करण्याच्या मागणीबाबत शासन निर्णय दि.३०.०४.२०२४ व दि.२१.०२.२०२५ अन्वये गठित करण्यात आलेल्या उपसमितीकडून प्राप्त शिफारशींचा अभ्यास करण्याकरिता खालीलप्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे.:-

| | | |
|---|---|---|
| १ | श्री. महेंद्र रा. जाधव, विधि सल्लागार-नि-सह सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २ | सह सचिव/उप सचिव (प्रशा), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३ | सह सचिव/उप सचिव (सेवा) (कार्या. ८), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ४ | श्रीम. मनिषा अ. कदम, सहायक सॉलिसिटर-नि-उप सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ५ | सरकारी वकील, सरकारी वकीलाचे कार्यालय, उच्च न्यायालय, अपील शाखा (रिट सेल), मुंबई | सदस्य |
| ६ | अवर सचिव (कार्या.८), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य सचिव |

२. सदर समितीने १३ सरकारी वकील कार्यालयातील अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतनसंरचनेत सुधारणा करण्याबाबत उपसमितीने केलेल्या शिफारशींचा अभ्यास करुन त्याबाबतचा अहवाल लवकरात लवकर सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२५०५१४१७५२०८०३५२१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SWATI LOHAR

Digitally signed by SWATI LOHAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=eaef1faf1fb5262ec7b0737903120dfa387867f017650e284f3e90868f26d12d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=AB72B061785AE0359686D1C8A0DDB0F52744A155BE1924D6AB3706E1DE7E60EC, cn=SWATI LOHAR
Date: 2025.05.14 17:53:19 +05'30'

**( स्वा. सु. लोहार )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य, उच्च न्यायालय, मुंबई.

२) प्रधान सचिव व विधि परामर्शी यांचे स्वीय सहायक, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.

३) प्रधान सचिव व वरिष्ठ विधि सल्लागार यांचे स्वीय सहायक, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.

४) श्री. महेंद्र रा. जाधव, विधि सल्लागार-नि-सह सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई

५) सह सचिव/उप सचिव (सेवा) (कार्या.८), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,

६) सह सचिव/उप सचिव (प्रशा), विधि व न्याय विभाग, शाखा औरंगाबाद.

७) श्रीम. मनिषा अ. कदम, सहायक सॉलिसिटर-नि-उप सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई

८) अवर सचिव (कार्या. ८), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.

९) सरकारी वकील, सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, अपील शाखा (रिट सेल), मुंबई.

१०) निवड नस्ती (कार्या.८)